**अधीक्षक अभियंता,धाराशिव पाटबंधारे मंडळ धाराशिव कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि.०१/०३/२०२४ ते ते ३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुवाढ-२०२४/(१३७/२०२४)/लपा**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :-१५/०३/२०२४

**पहावे :** १) शासन निर्णय क्रमांक मुवाढ-२०२३/(४६३/२०२३)/लपा,दिनांक : १९/१०/२०२३.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.
३) अधीक्षक अभियंता,धाराशिव पाटबंधारे मंडळ,धाराशिव यांचे पत्र जा.क्र.धापामंधा/आस्था-३/ ९३७/सह,दि. २३.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता,धाराशिव पाटबंधारे मंडळ,धाराशिव या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील २८पदांना दिनांक ०१/०९/२०२३ ते २९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भ क्र.२ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय:-** आता संदर्भ क्रमांक ३ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार आणि सोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये दर्शविल्याप्रमाणे अधीक्षक अभियंता,धाराशिव पाटबंधारे मंडळ,धाराशिव कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील २८ पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे, सदर कर्मचारी कार्यरत असेपर्यंत चालु राहतील.
२) उपरोक्त पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
३) मुदतवाढ मंजुरी द्यावयाची नियत अस्थायी पदे विहित आकृतीबंधातील असावीत व ही पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त/व्यपगत झालेली नसतील.
४) मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग,पुणे यांच्या कार्यालयाने उपलब्ध करुन दिलेल्या प्रस्तावामधील पदांची संख्या/पदांमधील घट/पदांमधील वाढ/सेवानिवृत्ती इ.माहिती अंतिम/ अचूक आहे असे गृहित धरुन त्यांचे मागणीनुसार पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.
५) या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहित प्रपत्रात प्रमाणपत्रासह विनाविलंब सादर करण्यात यावा.

नियत अस्थायी आस्थापनेच्या पदांचा वेतनाचा खर्च हा खाली नमुद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

“मागणी क्र.आय-५,मुख्य लेखा शिर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यांवरील भांडवली खर्च (८०)सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका, (०४) विविध पाटबंधारे विकास

महामंडळास भाग भांडवली अंशदान (वेतन) (०४)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (अनिवार्य) (४७०१ आय १६२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा" व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हा निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२१.०२.२०२४ अन्वये प्रशासकिय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३२०१२४१५५०४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VARSHA SANDEEP BHAGAT

Digitally signed by VARSHA SANDEEP BHAGAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=b200b2df2a6c4331b4a626db8cf6d32f7b30a2c5514afe21882df51ab8cdaad2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2711C10FA6CF7DA605799BE6228F533334F260EDEE79F096333766DAB604E021, cn=VARSHA SANDEEP BHAGAT
Date: 2024.03.20 12:51:14 +05'30'

( वर्षा भगत )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट-१**

**प्रत :-**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे
मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग,पुणे
मुख्य अभियंता,(विप्र) जलसंपदा विभाग,पुणे
अधीक्षक अभियंता, धाराशिव पाटबंधारे मंडळ,धाराशिव.
कार्यकारी अभियंता,धाराशिव लघु पाटबंधारे विभाग,धाराशिव.
कक्ष अधिकारी, आ(प्रशि) कार्यासन,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी आ(पुनर्रचना),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
वित्त विभाग (व्यय-१२)/अर्थ-१९,मंत्रालय,मुंबई
अर्थ-२,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती (मुदतवाढ)/लपा कार्यासन संग्रहार्थ.

**कार्यालयाचे नाव- अधीक्षक अभियंता,धाराशिव पाटबंधारे मंडळ,धाराशिव**

**परिशिष्ट-१**

(शासन निर्णय क्र. मुवाढ २०२४/(१३७/२०२४)/लपा,दि.१५/०३/२०२४ चे सहपत्र

नियत अस्थायी आस्थापनेवरील पदे दि. ०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत चालू ठेवणेबाबत

| अ.क्र. | पदाचे नाव | एकूण मंजूर पदे |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | अधीक्षक अभियंता | १ |
| २ | सहायक अधीक्षक अभियंता | १ |
| ३ | क.अ./स.अ.श्रे.२/शा.अ. | ३ |
| ४ | सहायक आरेखक/किंवा आरेखक | १ |
| ५ | अनुरेखक | १ |
| ६ | अधीक्षक | १ |
| ७ | प्रथम लिपिक | १ |
| ८ | वरिष्ठ लिपिक | ४ |
| ९ | कनिष्ठ लिपिक | ४ |
| १० | उच्चश्रेणी लघुलेखक/लघुश्रेणी लघुलेखक | १ |
| ११ | टंकलेखक | ३ |
| १२ | संगणक | १ |
| १३ | वाहनचालक | १ |
| १४ | नाईक | १ |
| १५ | शिपाई | ३ |
| १६ | चौकीदार | १ |
| | **एकूण** | **२८** |

VARSHA SANDEEP BHAGAT

Digitally signed by VARSHA SANDEEP BHAGAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=b200b2df2a6c4331b4a626db8cf6d32f7b30a2c5514afe21882df51ab8cdaad2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2711C10FA6CF7DA605799BE6228F533334F260EDEE79F096333766DAB604E021, cn=VARSHA SANDEEP BHAGAT
Date: 2024.03.20 12:51:39 +05'30'

**( वर्षा भगत )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**